**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, ठाणे कार्यालयाचे मुख्यालय घोषित करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः आस्थाप-२०१५/प्र.क्र. १०९ /मग्रारो-३**

नवीन प्रशासकीय इमारत, १६ वा मजला,
मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
तारीखः : ३१ जुलै, २०१५.

वाचा

१) **महसूल व वन विभागअधिसूचना क्र. .प्राफेब ११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दि.३१ जुलै,२०१४.**
२) **जिल्हाधिकारी ठाणे यांचे पत्र क्र.मग्रारोहयो/कक्ष-१/आस्था/टे-५/कावि २८८/१५, दि.२८.०४.२०१५.**

प्रस्तावना

महसूल व वन विभागाच्या संदर्भाधीन अ. क्र. १ मधील अधिसूचना दि.३१.०७.२०१४ अन्वये ठाणे जिल्हयाचे विभाजन करुन दि.०१.०८.२०१४ पासून ठाणे व पालघर असे दोन जिल्हे निर्माण करण्यात आले आहेत. विभाजनापूर्वी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, ठाणे यांचे मुख्यालय जव्हार येथे कार्यरत होते. विभाजनानंतर उपकोषागार कार्यालय, जव्हार हे जिल्हा कोषागार कार्यालय, पालघर यांच्या आस्थापनेतंर्गत समाविष्ट झाल्याने, पालघर जिल्हयासाठी नवीन कोषागार सांकेतांक क्रमांक देण्यात आलेला आहे. त्यानुसार ठाणे जिल्हाधिकारी कार्यालयासाठी नवीन आहरण व संवितरण अधिकारी सांकेतांक व जिल्हा कोषागार सांकेतांक प्राप्त करुन घेणे आवश्यक आहे. तरी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेचे मुख्यालय ठाणे म्हणून घोषित करण्याची विनंती जिल्हाधिकारी ठाणे यांनी केली आहे. या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

ठाणे जिल्हयाचे विभाजन होऊन दि.०१.०८.२०१४ रोजी नवनिर्मित पालघर जिल्हा अस्तिवात आला आहे. विभाजनापूर्वी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, ठाणे यांचे जव्हार येथे असलेले मुख्यालय जिल्हा कोषागार कार्यालय, पालघर यांच्या आस्थापनेअंतर्गत समाविष्ट झाले आहे. त्यामुळे महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, ठाणे कार्यालयाच्या वेतनविषयक बाबी व केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी यासाठी नवीन कोषागार सांकेतांक क्रमाक मिळण्यासाठी ठाणे हे मुख्यालय म्हणून पूर्वलक्षी प्रभावाने दि.०१.०८.२०१४ पासून याव्दारे घोषित करण्यात येत आहे.

२. सदरचे आदेश वित्त विभागाच्या अनौसं ३६०/१५/व्यय-८, दिनांक ७.७.२०१५ व अनौसं १६९/२०१५/कोषा प्र-५,दिनांक २०.०७.२०१५ अन्वये त्या विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७३११६२६५५१०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Ramesh Pimpale

Digitally signed by Prashant Ramesh Pimpale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prashant Ramesh Pimpale
Date: 2015.08.01 11:01:53 +05'30'

**प्रशांत र. पिंपळे**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अ.मु. स. (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अ.मु.स. (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (वि.सु.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
६. सर्व विभागीय आयुक्त.
७. जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक, मगांराग्रारोहयो, ठाणे/पालघर.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक, मगांराग्रारोहयो ठाणे/पालघर.
९. प्रधान महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
१०. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई.
११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / पालघर.
१४. सर्व उप सचिव/अवर सचिव, नियोजन विभाग (रोहयो), मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती, मग्रारो-३